जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद या संस्थेतील शिक्षकवर्गीय अधिका-यांना विद्यापिठ अनुदान आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी (६व्या वेतन आयोगाच्या शिफारशी) लागू करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय, क्रमांक- सवेआ १००९/(१७६/०९) लाक्षेवि(आस्था)
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक-३० जुलै, २०१०.

**वाचा :-** १) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. वाल्मी-२००४/(१७/०४)/ला(आस्था), दि.२९ फेब्रुवारी २००८.
२) शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्र.वेपूर १२०९/प्र.क्र.२७/सेवा-९, दि. २२/०४/२००९.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.वेपूर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि. २९/०४/२००९
४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.एनजीसी २००९/(२४३/२००९) -यूएनआय-१, दिनांक १२ ऑगस्ट २००९.

**प्रस्तावना :-**

जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद मार्फत जलसंपदा विभागातील अभियंते, कृषि अधिकारी आणि पाटबंधारे प्रकल्पाच्या जल व भूमी लाभक्षेत्रातील लाभधारक यांना प्रशिक्षण दिले जाते. संस्थेत ४६ शिक्षकवर्गीय पदे मंजूर असून सध्या संस्थेत संस्था नियुक्त १८ व प्रतिनियुक्तीवरील ७ अशी एकूण २५ शिक्षकवर्गीय पदे कार्यरत आहेत. उर्वरित रिक्त शिक्षकवर्गीय पदे नियुक्त करण्याची कार्यवाही सुरु आहे. शासन उच्च व तंत्र शिक्षण विभागाने विद्यापीठ अनुदान आयोगानुसार सर्व विद्यापीठातील शिक्षकवर्गीय पदांना ६ व्या वेतन आयोगानुसार लागू होणारी सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याचा संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निर्णय घेतला. त्याअनुषंगानेच वाल्मी, औरंगाबाद संस्थेतील शिक्षकवर्गीय अधिका-यांना (विद्यापीठ अनुदान

आयोगाच्या वेतनश्रेणी निश्चित झाल्यामुळे) ६ व्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेणी लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

विद्यापिठ अनुदान आयोगाच्या निश्चित केलेल्या सुधारित वेतनश्रेणीनुसार संदर्भ क्र. ४ येथील उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दिनांक १२/०८/२००९ च्या शासन निर्णयानुसार सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशी जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद या संस्थेतील शिक्षकवर्गीय अधिका-यांना दि. १ जानेवारी, २००६ पासून **(संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील ११ रिक्त शिक्षकवर्गीय पदे पुढे भरण्यात येणार नाहीत, या अटीच्या अधिन राहून )लागू करण्यात याव्यात.** सदर आदेशातील संदर्भ क्र. ३ व ४ येथील आदेशातील तरतुदीनुसार संबंधित शिक्षकवर्गीय अधिका-यांची यथा:स्थिती दि. १ जानेवारी, २००६ अथवा विकल्पाच्या दिनांकापासून काल्पनिक वेतनवाढी देऊन वेतननिश्चिती करण्यात येऊन सुधारित वेतनाचे प्रत्यक्ष लाभ दि. १ एप्रिल, २०१० पासून देण्यात यावे. तसेच दि. १ जानेवारी, २००६ ते दि. ३१ मार्च, २०१० या कालावधीतील **सुधारित वेतनाची कोणतीही थकबाकी संबंधितांना अनुज्ञेय असणार नाही.** ६ व्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी खालील शिक्षकवर्गीय पदांना लागू करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

वाल्मी, संस्थेतील प्राध्यापक, सहयोगी प्राध्यापक व सहायक प्राध्यापक यांची विद्यमान वेतनश्रेणी व सुधारीत वेतनश्रेणी खालीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | पदनाम | विद्यमान वेतनश्रेणी व असल्यास विशेष वेतन | ६ व्या वेतन आयोगानुसार सुधारीत वेतन संरचना | |
|---|---|---|---|---|
| | | | वेतन बॅड | ग्रेड वेतन |
| १ | प्राध्यापक | १६४००-४५०-२०९००-५००-२२४०० | ३७४००-६७००० | १०,००० |
| २ | सहयोगी प्राध्यापक | १२०००-४२०-१८३०० | ३७४००-६७००० | ९,००० |
| ३ | सहायक प्राध्यापक | ८०००-२७५-१३५०० | १५६००-३९१०० | ६,००० |

या आदेशान्वये लागू करण्यात आलेल्या सुधारित संरचनेमुळे होणारा अतिरिक्त खर्च संस्थेतील शिक्षकवर्गीय अधिकारी यांचे वेतन व भत्ते यावरील खर्च ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येतो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व तो संस्थेला मंजूर झालेल्या चालू वर्षाच्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४२९/सेवा-९, दि.०८/०७/२०१० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra . gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१००७३०२०२१५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ. रा. अरगडे )
शासनाचे अवर सचिव.

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. मंत्री, जलसंपदा विभाग (कृष्णा खोरे वगळून ) मंत्रालय, मुंबई,
सचिव, (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
वित्त विभाग ( सेवा-९) मंत्रालय, मुंबई
लाक्षेवि (आस्था) संग्रहार्थ